व्यावसायिक पदविका अभ्यासक्रमाच्या संस्थेचे पदविका स्तरावरून पदवी स्तरावर परिवर्तन करण्यास, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने, शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून शासन मान्यता देणेबाबत......
श्री संतकृपा इन्स्टिटयूट ऑफ
इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, घोगाव,
जि.सातारा

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१७/प्र.क्र.१४५/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक: १९ जून, २०१७

**संदर्भ :** १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दि.०९.०५.२०१७ रोजी उपलब्ध करून दिलेली मान्यतेची यादी
२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/ मान्यता/२०१७/५६३, दिनांक ११.०५.२०१७

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन-१ अन्वये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी श्री संतकृपा इन्स्टिटयूट ऑफ इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, घोगाव, जि.सातारा या संस्थेचे पदविका स्तरावरून पदवी स्तरावर परिवर्तन करण्यास प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भाधीन-२ येथील पत्रान्वये संचालक, तंत्र शिक्षण यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुलक्षून सदर संस्थेस शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त संदर्भाधीन-१ अन्वये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भाधीन-२ अन्वये संचालक, तंत्र शिक्षण यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार श्री संतकृपा इन्स्टिटयूट ऑफ इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, घोगाव, जि.सातारा या पदविका संस्थेचे पदवी अभ्यासक्रमाच्या संस्थेत परिवर्तन करण्यास, खाली नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून, शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर संस्थेतील पदवी अभ्यासक्रम व त्यांची प्रवेशक्षमता सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ (Annexure A) मध्ये नमूद केल्यानुसार असेल.

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेक्षक्षमता वर नमूद केल्याप्रमाणे राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदव्युत्तर अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

११) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१२) ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतिम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१९१५२६१३१२०८ असा आहे. सदर शासन निर्णय हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Madan Maruti Morve

Digitally signed by Madan Maruti Morve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2efbf911362ce57b361b7f36471cb98eb98ed47e7de8b061211b9d7e6e0fc2e3, cn=Madan Maruti Morve
Date: 2017.06.21 13:07:02 +05'30'

**( म.मा.मोरवे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, पुणे (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. कुलसचिव,डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि. रायगड . (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. संचालक, श्री संतकृपा इन्स्टिटयूट ऑफ इंजिनिअरींग अॅन्ड टेक्नॉलॉजी ,घोगाव , ता.कराड, जि.सातारा.-४१५ १११.
५. सदस्य सचिव अखिल भारतीय ,तंत्र शिक्षण परिषद ७ ,वा मजला चंद्रलोक, बिल्डींग जनपथ, नवी दिल्ली- ००१ ११०
६. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
७. निवड नस्ती/तांशि-४

Higher and Technical Education Department, Government Resoluation No. TEM-2017/C.R. 145/TE-4, Dated 19.06.2017
List of Conversion ( Diploma to Degree) Institute Approved by AICTE A.Y. 2017-18
प्रपत्र अ (Annexure A)

| SR. No. | DTE Code | NAME OF THE INSTITUTE | INSTITUTE ADDRESS | INSTITUTE DISTRICT | INSTITUTE TYPE | Institute Name Change | Applied for Diplome to Degree Conversion | Approved for Diploma to Degree Conversion | PROGRAMME | AFFILIATING UNIVERSITY DEPARTMENT | LEVEL OF COURSE | COURSE | SHIFT | FULL TIME / PART TIME | APPROVED INTAKE 2016_17 | APPROVED INTAKE 2017_18 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 6466 | SHREE SANTKRUPA INSTITUTE OF ENGINEERING & TECHNOLOGY | A/P:-GHOGAON (SHIVAJINAGAR) TAL:-KARAD DIST:-SATARA | SATARA | Unaided - Private | Y | Y | Y | ENGINEERING AND TECHNOLOGY | Dr Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | UNDER GRADUATE | CIVIL ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| | | | | | | | | | | | | COMPUTER SCIENCE AND ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| | | | | | | | | | | | | ELECTRICAL ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| | | | | | | | | | | | | ELECTRONICS & TELE-COMMUNICATION ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 0 | 0 |
| | | | | | | | | | | | | MECHANICAL ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |